**समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण व माध्यमिक शिक्षण) कार्यक्रमासाठी पहिल्या हप्त्याचा अनुसूचित जमाती (TSP) उप योजनेचा निधी वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः समग्र-२०२१/प्र.क्र.१११ भाग-३/एस.डी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३१ मार्च, २०२२

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६/०४/२०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/०६/२०२१
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२९/०७/२०२१
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१७/०३/२०२२
५) केंद्र शासन, शिक्षण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे आदेश क्रमांक: F.No-७-४/२०२१-IS-१२(ST), दि.२८/०३/२०२२ (तीन आदेश)
६) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र. मप्राशिप/लेखा-२/1st Inst/Ele,Sec,TE/Rec, Non Rec/(SAP, GEN, SC, ST) निधी मागणी/ २०२१-२२/९८९, दि.२९/०३/२०२२
७) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.४/कार्यासन-६, दि.३१/०३/२०२२

**प्रस्तावना:-**

समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण व माध्यमिक शिक्षण) योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक २८/०३/२०२२ रोजीच्या आदेशान्वये प्राथमिक शिक्षणासाठी केंद्र शासनाच्या पहिल्या हप्त्याचा (अनुसूचित जमाती उपयोजना हिस्सा (TSP)) रु.४५,२४,५५,०००/- इतका आवर्ती व रु.५,५७,३७,०००/- इतका अनावर्ती निधी असा एकूण ५०,८१,९२,०००/- निधी मंजूर केला आहे. त्यास समरुप राज्य हिस्सा रु.३०,१६,३६,६६७/- आवर्ती व रु.३,७१,५८,०००/- अनावर्ती निधी इतका येतो. तसेच माध्यमिक शिक्षणासाठी रु.१,५२,८०,०००/- इतका अनावर्ती निधी मंजूर केला आहे. त्यास समरुप राज्य हिस्सा रु.१,०१,८६,६६७/- इतका अनावर्ती निधी इतका येतो.

२. वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६४/अर्थोपाय, दिनांक ३१/०३/२०२२ अन्वये केंद्र हिस्सा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे अभिप्राय दिले आहेत.

३. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी संदर्भ क्र.६ येथील पत्रान्वये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. आदिवासी विकास विभागाने दि.३१/०३/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

## शासन निर्णयः-

केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे प्राथमिक व माध्यमिक शिक्षणासाठी उपलब्ध करुन दिलेला निधी खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे समग्र शिक्षा कार्यक्रमाच्या (प्राथमिक शिक्षण व माध्यमिक शिक्षण) च्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर विवरणपत्रातील स्तंभ क्र.४ येथील वितरीत करावयाची तरतूद स्तंभ क्र.२ येथील लेखाशिर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

| अ. क्र. | लेखाशिर्ष | सन २०२१-२२ या वर्षात सुधारित अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| अ | "मागणी क्रमांक टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (१०) समग्र शिक्षा अभियान (अनुसूचित जमाती उपयोजना (TSP), (केंद्र हिस्सा ६० टक्के), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२I६४८)" | रु.१८३.७५ कोटी | १) रु.४५,२४,५५,०००/- आवर्ती प्राथमिक<br>२) रु.५,५७,३७,०००/- अनावर्ती प्राथमिक<br>**एकूण प्राथमिक रु.५०,८१,९२,०००/-**<br><br>१) रु.१,५२,८०,०००/- अनावर्ती माध्यमिक<br>**एकूण माध्यमिक १,५२,८०,०००/-** |
| | | **एकूण (अ)** | **रु.५२,३४,७२,०००/-** |
| ब | "मागणी क्रमांक टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (११) समग्र शिक्षा अभियान (अनुसूचित जमाती उपयोजना (TSP), (राज्य हिस्सा ४० टक्के), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२I६५७)" | रु.७२.९९९० कोटी | १) रु.३०,१६,३६,६६७/- आवर्ती प्राथमिक<br>२) रु.३,७१,५८,०००/- अनावर्ती प्राथमिक<br>**एकूण प्राथमिक रु.३३,८७,९४,६६७/-**<br><br>१) रु.१,०१,८६,६६७/- अनावर्ती माध्यमिक<br>**एकूण माध्यमिक रु.१,०१,८६,६६७/-** |
| | | **एकूण (ब)** | **रु.३४,८९,८१,३३४/-** |
| | | **एकूण (अ)+(ब)** | **रु.८७,२४,५३,३३४/-** |
| | **रुपये सत्याऐंशी कोटी चोवीस लाख त्रेपन्न हजार तीनशे चौतीस फक्त** | | |

**२.** वित्त विभाग, शासन निर्णय/परिपत्रक दि.६/०४/२०२१, दि.२४/०६/२०२१, दि.२९/०७/२०२१ व दि.१७/०३/२०२२ मध्ये नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

**३.** सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि.२८/०३/२०२२ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०२१-२२ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक

प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा अंतर्गत प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाच्या चालू योजनांच्या आवर्ती / अनावर्ती खर्चासाठी खर्च करावा.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५. अनुसूचित जमाती या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय /उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ.माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

८. सदर खर्च वित्त विभाग, शासन निर्णय/परिपत्रक दि.६/०४/२०२१, दि.२४/०६/२०२१, दि.२९/०७/२०२१ व दि.१७/०३/२०२२ मधील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह / उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय/परिपत्रक दि.६/०४/२०२१, दि.२४/०६/२०२१, दि.२९/०७/२०२१ व दि.१७/०३/२०२२ अन्वये, आदिवासी विकास विभागाच्या दि.३१/०३/२०२२ च्या शासन निर्णयान्वये व वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.६४/अर्थोपाय, दि.३१/०३/२०२२ तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.४७४/व्यय-१४, दि.३१/०३/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३११३०६०८६६२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2022.03.31 19:45:41 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
४) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
६) मा.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
८) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१०) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
११) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१२) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१३) उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) वित्त विभाग(व्यय-१४ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१५) कक्ष अधिकारी, लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती (एस.डी.१).